**राष्ट्रीय नदी संवर्धन योजनेंतर्गत मुळा-मुठा नदी, पुणे प्रदूषण कमी करण्याचा प्रकल्प या केंद्र पुरस्कृत योजनेसाठी केंद्र शासनाकडून मुक्त केलेला निधी SNA खात्यात जमा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : रानयो-२०२२/प्र.क्र.१८२/आस्थापना-अ**
नविन प्रशासन भवन, १५वा मजला,
हुतात्मा राजगूरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : २९/०३/२०२५.

**संदर्भ-** १)भारत सरकार यांच्या वित्त मंत्रालाचे कार्यालयीन ज्ञापन F. No. १ (१३) PFMS / FCD / २०२०, दि.२३.०३ २०२१.
२) अवर सचिव, जलशक्ती मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र.J-२७०१७/ ३/ २०१२-NRCD-II-Pt.File II, दि. २७ मार्च, २०२५.

**प्रस्तावना :**

राष्ट्रीय नदी संवर्धन योजनेंतर्गत पुणे शहरातील मुळा-मुठा नदी संवर्धन करण्याच्या प्रस्तावासाठी केंद्र शासनाने एकूण निधी रू. ९९०.२६ कोटी (अक्षरी रु. नऊशे नव्वद कोटी सव्वीस लक्ष फक्त) इतक्या रकमेच्या प्रस्तावास सन २०१६ मध्ये मजूरी दिलेली आहे. सदर प्रकल्पातील एकूण प्रस्ताव रकमेच्या ८५ टक्के हिस्सा (रु. ८४१.७२ कोटी) हा केंद्र शासनाचा व उर्वरित १५ टक्के हिस्सा (रु. १४८.५३ कोटी) हा पुणे महानगरपालिकेचा आहे. यानुषंगाने आतापर्यंत केंद्र शासनाकडून प्राप्त रुपये ४५०.४५ कोटी इतका निधी राज्य शासनामार्फत पुणे महानगरपालिकेस वितरित करण्यात आलेला आहे.

केंद्र शासनाने संदर्भिय वाचा क्र.१ अन्वये, केंद्र पुरस्कृत योजनांना निधी वितरित करण्यासाठी व त्यावर देखरेख ठेवण्यासाठी सुधारित कार्यपद्धती अंमलात आल्याबाबत कळविले आहे. तसेच त्यात दिलेल्या कार्यपद्धतीनुसार सर्व केंद्र पुरस्कृत योजनांबाबत कार्यवाही करण्याबाबत निर्देश देण्यात आलेले आहेत. त्यानुसार केंद्र शासनाकडून प्राप्त होणारा निधी वितरित करण्यासाठी बँक ऑफ महाराष्ट्र या बँकेत Single Nodal Account (मंत्रालय शाखा खाते क्र.६०४००९८४२५३, IFSC- MAHB०००१३८८) खाते उघडण्यात आले आहे.

आता संदर्भिय वाचा क्र.२ येथील पत्रांन्वये मुळा-मुठा नदी संवर्धनासाठी केंद्र शासनाने रु.१७१.०० कोटी इतका निधी वितरीत केला असून सदर निधी राज्याच्या एकत्रित निधीत जमा झाल्याचे अर्थोपाय (वित्त विभाग) यांनी ई-मेलद्वारे कळविले आहे. सबब, केंद्र शासनामार्फत वितरित करण्यात आलेला रुपये १७१,००,००,०००/-(रुपये एकशे एक्काहत्तर कोटी फक्त) इतका निधी SNA खात्यात वर्ग करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

केंद्र शासनाकडून केंद्र पुरस्कृत योजनांच्या निधीचे परिणामकारक व्यवस्थापन करण्याच्या तसेच निधी विनियोगामध्ये अधिक परिणामकारकता आणण्याच्या दृष्टीने सार्वजनिक वित्तीय प्रणाली (PFMS) द्वारे निधी वितरित करण्यास सुरूवात करण्यात आलेली आहे. त्यानुषंगाने National River Conservation Plan ही केंद्र पुरस्कृत योजना PFMS प्रणालीवर मॅप केलेली आहे.

२. राष्ट्रीय नदी संवर्धन योजनेंतर्गत मुळा-मुठा नदी संवर्धनासाठी केंद्र शासनाकडून प्राप्त रुपये १७१,००,००,०००/-(रुपये एकशे एक्काहत्तर कोटी फक्त) इतका निधी SNA खात्यात वर्ग करण्यासाठी मान्यता देण्यात येत आहे. सदरनुसार देण्यात येणारे अनुदान सशर्त आहे. त्यानुसार सदर वितरित केलेला निधी खर्च झाल्याचे उपयोगिता प्रमाणपत्र विभागास सादर केल्यानंतर निधीचा पुढील हप्ता वितरित करण्याच्या शर्तीसह वितरित करण्यात येत आहे.

३. सदर प्रयोजनार्थ होणारा खर्च मागणी क्र.यु-४, परिस्थितीकी व पर्यावरण, प्रदूषण प्रतिबंध व नियंत्रण, गौण लेखाशीर्ष १०३ वायु व जलप्रदूषण प्रतिबंध, गट शीर्ष (०३) राष्ट्रीय नदी संवर्धन योजना, योजनेचे नाव- (०३) (०१) मुळा-मुठा नदी, पुणे प्रदूषण कमी करण्याचा प्रकल्प, (३४३५ १३६५), ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या मुख्य लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या वर्षासाठीच्या मंजूर केलेल्या अनुदानातून वितरित करण्यात येत आहे.

४. राष्ट्रीय नदी संवर्धन योजना या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत मुळा-मुठा नदी संवर्धनासाठी केंद्र शासनामार्फत वितरित करण्यात आलेला रुपये १७१,००,००,०००/-(रुपये एकशे एक्काहत्तर कोटी फक्त) इतका निधी बँक ऑफ महाराष्ट्र या बँकेत Single Nodal Account (मंत्रालय शाखा खाते क्र.६०४००९८४२५३, IFSC- MAHB०००१३८८) खात्यात थेट जमा करण्यात यावा.

५. सदर निधीबाबत श्री. सु.कि.निकम, सहसचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग,मंत्रालय यांना Single Nodal Agency व श्री. किशोर सोईतकर, कार्यासन अधिकारी, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग यांना आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात आलेले आहे.

६. प्रस्तूत शासन निर्णय वित्त विभागाच्या परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२४/प्रक्र.८०/अर्थ-३, दिनांक २५ जुलै, २०२४ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३२९१४१३१७८७०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SURYAKANT
KISAN NIKAM

Digitally signed by SURYAKANT KISAN NIKAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=ENVIRONMENT AND CLIMATE CHANGE DEPARTMENT, 2.5.4.20=3978ce8e745a91e0561f6f9473df7e92873ee7ac8c2f7c49ac520e61061ddded, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3A94A1F658A34D45CA2859DBC88DFB40760079B8946087EF0FB8BC7CD7314C27, cn=SURYAKANT KISAN NIKAM
Date: 2025.03.29 14:14:34 +05'30'

**( सु. कि. निकम ),**
**सह सचिव (पर्यावरण व वातावरणीय बदल),**
**महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राज भवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री (पर्यावरण व वातावरणीय बदल) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव (पर्यावरण व वातावरणीय बदल), मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. आयुक्त, पुणे महानगरपालिका, जि.पुणे.
८. महालेखापाल (लेखापरिक्षा)-१, महाराष्ट्र,मुंबई-४०००२०
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई-४०००२०
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
११. महालेखापाल (लेखापरिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
१२. अधिदान व लेखाधिकारी, वांद्रे (पूर्व) मुंबई-४०००५१.
१३. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१४. निवासी लेखाधिकारी, मुंबई
१५. संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई
१६. मुख्यलेखा परिक्षक, स्थानिक निधीलेखा, कोकण भवन, मुंबई
१७. वित्त विभाग (व्यय-१६)
१८. नियोजन विभाग (कार्यासन-१४७२)
१९. पर्यावरण व वातावरणीय बदल विभागातील सर्व कार्यासने
२०. निवड नस्ती